**शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सिंधुदुर्ग या संस्थेतील विद्यार्थ्यांसाठी वसतीगृह व वाहतुक सेवा भाडयाने उपलब्ध करुन घेण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः निभाडे-०६२४/प्र.क्र.२४८/प्रशा-२**
गो.ते. रुग्णालय आवार, नवीन मंत्रालय, ९ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१
तारीख: २६ ऑगस्ट २०२४

**वाचा :-**

१) शासन निर्णय वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांकः एमईडी-२०१६/प्र.क्र.२३१/१६/शिक्षण-१, दिनांक ०८/१२/२०२०

२) शासन निर्णय वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांकः एमईडी-२०१६/प्र.क्र.२३१/१६/शिक्षण-१, दिनांक ११/०२/२०२२

३) आयुक्त, वै. शि. यांचे पत्र क्र. डीएमईआर-१२०११/४/२०२२-ईडीयु, दिनांक ०८/०४/२०२४

**प्रस्तावना:-**

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सिंधुदुर्ग येथे १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व त्यास संलग्नीत ५०० रुग्णखाटांचे रुग्णालय सुरु करण्यास शासनाने संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मंजूरी प्रदान केली आहे. शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सिंधुदुर्ग येथे शैक्षणिक वर्ष २०२१-२२ मध्ये १०० विद्यार्थी प्रवेश प्रक्रिया पुर्ण करण्यात आली आहे. शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सिंधुदुर्ग हे महाविद्यालय नवनिर्मित असल्यामुळे वैद्यकीय शिक्षणासाठी प्रवेशित विद्यार्थ्यांना राहण्यासाठी संस्थेचे स्वत:चे वसतिगृह उपलब्ध नाही. त्यामुळे उक्त महाविद्यालयात प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांच्या वास्तव्याची सोय तातडीने होण्याच्या दृष्टीने तसेच राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोग यांच्या मानकांची पुर्तता होण्याच्या दृष्टीने, मे. वर्धन टेड्रर्स, सिंधुदुर्ग यांच्या ताब्यातील खाजगी इमारत व विद्यार्थ्यांना ने-आण करण्याकरीता वाहतुक सेवा भाडेतत्वावर घेण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सिंधुदुर्ग या संस्थेमध्ये प्रवेशित विद्यार्थ्यांकरीता वास्तव्याची सोय तातडीने होण्याच्या दृष्टीने तसेच राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोग यांच्या मानकांची पुर्तता होण्याच्या दृष्टीने मे. वर्धन टेड्रर्स, सिंधुदुर्ग यांच्या ताब्यातील खाजगी इमारत व विद्यार्थ्यांना ने-आण

करण्याकरीता वाहतुक सेवा भाडेतत्वावर घेण्यास व त्याकरीता प्रतिमाह रु. ३,७५,०००/- प्रमाणे रु. ४५,००,०००/- (अक्षरी रुपये पंचेचाळीस लाख फक्त)( जी.एस.टी कराव्यतिरिक्त) इतके वार्षिक भाडे अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर भाडेकरार इमारत महाविद्यालयास उपलब्ध करुन दिलेल्या दिनांकापासून अंमलात येईल व त्याची मुदत ०३ वर्ष कालावधी व त्यानंतर महाविद्यालयाच्या आवश्यकतेप्रमाणे जोपर्यंत शासकीय इमारत उपलब्ध होत नाही तो पर्यंत टप्प्याटप्प्याने मुदतवाढ शासन मान्यतेने करता येईल.

३. याबाबतचा सामंजस्य करार अधिष्ठाता यांनी संस्थास्तरावर करावा.

४. वसतिगृहाचे खर्च व वहातूक खर्च शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सिंधुदुर्ग या संस्थेच्या अनुक्रमे (१४) भाडेपट्टी व कर खर्च व (१३) कार्यालयीन खर्च या उद्दिष्टांतर्गतून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -१, अनुक्रमांक-१० अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८२६१६४४५१२३१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO GIRDHARI JOGDAND

Digitally signed by MAHADEO GIRDHARI JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO GIRDHARI JOGDAND
Date: 2024.08.28 14:49:43 +05'30'

**(म.गि.जोगदंड)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखाकार - १/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र,मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
३. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सिंधुदुर्ग.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग.
५. मे. वर्धन टेड्रर्स, सिंधुदुर्ग
६. निवडनस्ती (प्रशा-२).